**कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अंशदान, ५४-गुंतवणूक खाली निधी वितरीत करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कोचिन-२०२३/प्र.क्र.१२१/सां.का.१**
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२४

**वाचा :**

१. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्रमांक कोचिन-२०२३/प्र.क्र.१२१/ सां.का.१, दि.२८ नोव्हेंबर, २०२३.
२. व्यवस्थापकीय संचालक,कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित यांचे पत्र क्र.कोचिन/२०२३/१५२, दि.०८.११.२०२३.

**प्रस्तावना :**

कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणूक या लेखाशिर्षाखाली वित्त विभागाने सन २०२३-२४ या वित्तीय वर्षातील सुधारित अंदाजान्वये रु.५.६० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्यापैकी रु.१.४० कोटी इतका निधी खर्ची पडलेला आहे. सद्य:स्थितीत १००% च्या मर्यादेत म्हणजेच उर्वरित रु.४.२० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणाली (BEAMS) वर वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. प्रस्तुत कामांच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून, सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाला भागभांडवली अशंदान वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात कोल्हापूर चित्रनगरीचा महामंडळाच्या पुनर्विकास प्रकल्पास भागभांडवली अंशदान म्हणून **रु.४.२० कोटी (रुपये चार कोटी वीस लक्ष फक्त)** इतके सहायक अनुदान सशर्त असून, खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

१. शासनाने भांडवली कामासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीची गणना कोल्हापूर चित्रनगरी महामंडळाच्या भांडवलातील शासनाच्या सहभागात करण्यात यावी.
२. महामंडळाला ज्या प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनावर निधीचा वापर करण्यात यावा. निधीचा वापर अन्य कोणत्याही प्रयोजनार्थ करण्यात येऊ नये.
३. शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र विहित मुदतीत सादर करण्यात यावे.
४. महामंडळाने केलेल्या खर्चाच्या विवरणाबरोबरच उपरोक्त कामांची प्रगती व भौतिक साध्य याची तपशिलवार माहिती संचालक मंडळाला वेळोवेळी अवगत करण्यात यावी व दर तीन महिन्यांनी विभागाला देखील अवगत करण्यात यावी.
५. सदरचा निधी खर्च करण्यापूर्वी संचालक मंडळाची मान्यता घेण्यात यावी.

**२.** यासाठी होणारा खर्च “क्र.झेडडी-५, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च (००) (०२) कोल्हापुर चित्रनगरी महामंडळाला भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणुका” या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. या प्रयोजनासाठी उपसचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर यांना सदर रक्कम एकरकमी वितरीत करावी.

४. विचाराधीन खर्चासंदर्भात वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२ एप्रिल, २०२३ मधील परिच्छेद ०७ व परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणी सूचीतील क्र.१,२,३,४ व ९ची पूर्तता होत असून उर्वरीत परिच्छेद व परिशिष्टातील अटी सदर प्रकरणी लागू होत नाहीत.

५. सदर शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५ मधील अ.क्र.०१ परिच्छेद क्र.१३४ नुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत केलेल्या तरतूदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.सं.क्र.१८७, दि.१४.३.२०२४ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७६/२०२४/व्यय-१५, दि.२७.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३३०१८४१०३११२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH KISAN WAVHAL

Digitally signed by MAHESH KISAN WAVHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=495C75B4C173C81F308BD63A1B33A5DA4EA131ED182D44EA1B502AB4662E9810, cn=MAHESH KISAN WAVHAL
Date: 2024.03.31 15:46:48 +05'30'

**( म. कि. वाव्हळ )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री,सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. उप सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक,कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित,कोल्हापूर.
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र ,मुंबई
६. महालेखापाल ( लेखापरीक्षा )-१, महाराष्ट्र, मुंबई
७. वित्त विभाग (सा.उ. /व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
८. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई (यांना उक्त अनुदानाची रक्कम BDS द्वारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
१२. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (सां.का.१)